**ॲड. श्रीकृष्ण उर्फ अजित नारायण भणगे यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत....**
**वेंगुर्ला पोलीस स्टेशन, सिंधुदुर्ग येथे गु.र.क्र. ८२/२०२२ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणातील कामकाजाकरीता.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०५२३/प्र.क्र.९८/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३१ जुलै, २०२४.

**संदर्भ:-** (१) विधि व न्याय विभाग, अधिसूचना क्र. SPP-2023/UOR-67/D-XIV , दि. १९.१२.२०२३.

**शासन निर्णय :-**

वेंगुर्ला पोलीस स्टेशन, सिंधुदुर्ग येथे गु.र.क्र. ८२/२०२२ अन्वये दाखल गुन्ह्यातून उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणात मा.प्रथम न्यायदंडाधिकारी, वेंगुर्ला व मा. जिल्हा व सत्र न्यायालय,सिंधुदुर्ग या न्यायालयांतील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी “विशेष सरकारी अभियोक्ता” म्हणून संदर्भाधीन अधिसूचनेन्वये नियुक्त ॲड. श्रीकृष्ण उर्फ अजित नारायण भणगे यांना खालील प्रमाणे फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रू. १५,०००/- (अक्षरी रुपये पंधरा हजार फक्त)
२) अधिक प्रत्यक्ष होणारा खर्च (टंकलेखन, झेरॉक्स यासाठी होणारा प्रत्यक्ष खर्च)

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. श्रीकृष्ण उर्फ अजित नारायण भणगे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या “मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस -(००)१०९, जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८)- २८ व्यावसायिक सेवा” या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४७७/२०२१/व्यय-७, दि. १२.०७.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०७३११५४०५७४९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MURLIDHAR
MADANRAO MUNDE

Digitally signed by MURLIDHAR MADANRAO MUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=282312ebca8590dedb8028575064d7754a3c5702d668b43d226ef7b32ee3a517, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=716527D5A822F9E40134FCE6C6C6B8E1521D5C66E1D2D46A3F04B04DE16DF388, cn=MURLIDHAR MADANRAO MUNDE
Date: 2024.07.31 15:56:05 +05'30'

**( मुरलीधर मुंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परिक्षेत्र, कोकण भवन,नवी मुंबई.
३) पोलीस अधीक्षक, सिंधुदुर्ग.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य १/२ , मुंबई/नागपुर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) ॲड. श्रीकृष्ण उर्फ अजित नारायण भणगे.
८) कार्यासन अधिकारी (का-१४), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती पोल-१०.